उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीबाबत - श्री.ए.व्ही.पाटील, उपनिबंधक सहकारी संस्था

**महाराष्ट्र शासन**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन आदेश क्रमांकः राजस -२०२३/प्र.क्र.१४७/५स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- २६ मे, २०२३

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (१), ४ (२), ४ (३) व ४ (४) मधील तरतुदीनुसार सहकार खात्यातील खाली नमूद केलेल्या उपनिबंधक सहकारी संस्था गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्यानुसार बदलीने नियुक्ती करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री.ए.व्ही.पाटील | उपनिबंधक सहकारी संस्था, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण मर्या.मुंबई. | श्री.प्रशांत सोनवणे उपनिबधक सहकारी संस्था (म्हाडा),मुंबई यांच्या दि. ३१ मे, २०२३ रोजी सेवानिवृत्तीने रिक्त होणाऱ्या पदावर. |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांनी आपल्या पदाचा कार्यभार समकक्ष वा नजीकच्या कनिष्ठ अधिका-याकडे सोपवून पदस्थापनेच्या ठिकाणी श्री. प्रशांत सोनवणे यांच्या सेवानिवृत्तीनंतर तात्काळ रुजू व्हावे व तसा अहवाल सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

३. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांनी सदरचे आदेश तात्काळ अंमलात येतील याबाबत योग्य ती कार्यवाही करावी.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०५२६१८४५२१६८०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL JAYRAM
CHAUDHRY

Digitally signed by ANIL JAYRAM CHAUDHRY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D124AE9BBD15BED87DBD08EF779CF1B85A4020339EB1C2EF0E112FB67063011C, cn=ANIL JAYRAM CHAUDHRY
Date: 2023.05.26 18:46:40 +05'30'

**(अनिल चौधरी)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
५. संबधीत विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था (प्रशासन व लेखापरिक्षण), व्दारा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता).
७. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
८. श्री.ए.व्ही.पाटील, उपनिबंधक सहकारी संस्था, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण मर्या.मुंबई.
९. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. अपर मुख्य सचिव (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक.
१२.मा.सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक.
१३.निवड नस्ती (कार्यासन-५-स).